**मौजे ढवळपूरी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे लोकर प्रक्रिया केंद्र स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- पविआ-२०२३/प्र.क्र.२८४/पदु-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४

वाचा-: १. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. जमीन-३३२४/प्र.क्र.५३/ज-६, दि. ०९.०२.२०२४.
२. शासन निर्णय क्र. पविआ-१०२३/प्र.क्र.२८४/पदुम-३, दि.१६.०२.२०२४
३. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. जमीन-३३२४/प्र.क्र.५३/ज-६, दि. १५.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

वाचा क्र. १ येथील दि. ९.२.२०२४ रोजीच्या महसूल विभागाच्या ज्ञापनान्वये मौजे करंदी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे लोकर प्रक्रिया केंद्र स्थापन करण्याकरिता ३.०० हे. आर शासकिय जमिन प्रदान करण्यात आली होती. त्यास अनुसरुन वाचा क्र. २ येथील दि. १६.०२.२०२४ अन्वये अहमदनगर जिल्ह्यातील मौजे करंदी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे लोकर प्रक्रिया केंद्र स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली होती.

तद्नंतर व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांनी दि.२०.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये मौजे ढवळपूरी येथील मेंढपाळांची संख्या व त्यांची असणारी मागणी या बाबींचा विचार करता तेथे लोकर प्रक्रिया केंद्राची स्थापना झाल्यास मेंढपाळांसाठी सोईचे होणार असल्याने मौजे करंदी ता. पारनेर, जि. अहमदनगर ऐवजी मौजे ढवळपूरी ता. पारनेर, जि. अहमदनगर येथील गट नं. १०२१ मधील २ हे. १० आर. क्षेत्र लोकर प्रक्रिया केंद्र स्थापन करण्यासाठी वितरीत करण्याबाबत जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना विनंती केली होती.

सदर विनंतीच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त, नाशिक यांच्याकडून महसूल विभागास प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने महसूल विभागाने शासन ज्ञापन दि. ९.२.२०२४ अन्वये मौजे करंदी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथील ३ हे. ०० आर एवढी शासकीय जमिन प्रदान करण्याबाबतचे शासन ज्ञापन रद्द करुन त्याऐवजी मौजे ढवळपूरी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथील गट नं. १०२१ मधील क्षेत्र १ हे. ६२ आर. पो. ख. क्षेत्र ०० हे ४७ आर एकूण क्षेत्र २ हे. १० आर

पैकी निर्बाध्यरित्या वाटपास उपलब्ध असलेले क्षेत्र १ हे. ७० आर ऐवढी शासकीय जमिन महाराष्ट्र जमिन महसूल (सरकारी जमिनिची विल्हेवाट लावणे) नियम १९७१ चे नियम ५ व नियम ६ (१) (चार) (ब) व ६ (३)(ब) नुसार भोगाधिकार मुल्यरहित व महसुलमुक्त किंमतीने काही नियम, अटी व शर्तीवर प्रदान करण्यास दि.१५.०३.२०२४ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये मान्यता दिली आहे. सदर बाब विचारात घेऊन वाचा क्र. २ येथील दि. ०६.०२.२०२४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.:-

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा क्र. ३ येथील आदेशान्वये मौजे करंदी, ता. पारनेर, जि. अहमदनगर ऐवजी मौजे ढवळपूरी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे गट नं. १०२१ मधील क्षेत्र १ हे. ६३ आर पो. ख. क्षेत्र ०० हे. ४७ आर एकूण २ हे. १० आर. पैकी निर्बाध्यरित्या वाटपास उपलब्ध असलेले क्षेत्र १ हे. ७० आर एवढी जमिन "लोकर प्रक्रिया केंद्र" स्थापन करण्यासाठी उपलब्ध करुन दिली आहे.

महसूल व वन विभागाचे उपरोक्त आदेश विचारात घेऊन वाचा क्र. २ येथील दि. १६.०२.२०२४ शासन निर्णयान्वये मौजे करंदी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे लोकर प्रक्रिया केंद्र स्थापन करण्यास दिलेली मान्यता या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत असून आता सदर "लोकर प्रक्रिया केंद्र" मौजे ढवळपूरी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथील गट नं. १०२१ मधील क्षेत्र १ हे. ६३ आर पो. ख. क्षेत्र ०० हे. ४७ आर एकूण २ हे. १० आर. पैकी निर्बाध्यरित्या वाटपास उपलब्ध असलेले क्षेत्र १ हे. ७० आर या जागेत स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर लोकर प्रक्रिया केंद्र कार्यान्वित करण्यासाठी पुढील आवश्यक ती कार्यवाही व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१९३०३५१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.03.15 19:40:54 +05'30'

**(नि.भा.मराळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. जिल्हाधिकारी, अहमदनगर
४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे
५. मा. मंत्री (पदु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अहमदनगर
७. निवड नस्ती-३